SS श्री गणेश प्रसन्न SS

सप्रेम नमस्कार विनंती विशेष,

सालबादाप्रमाणे ह्या वर्षीसुद्धा ईस्ट बे मराठी मंडळाने "ई.बी.एम्.एम्." आपला गणेशोत्सव रविवार दीनांक 11 सप्टेंबर 2005 रोजी व्हेटरन्स ममोरियल बिल्डींग, प्लेझंटन, कॅलिफोर्निया येथे धुमधडाक्यांत साजरा केला. ईस्ट बे मधील इच्छुक मराठी भाषिकांना सामावून घेण्याच्या उद्देशाने ह्या सुमुहुर्तावर "ई.बी.एम्.एम्." हे नविन व्यापक नांव पूर्वाश्रमीच्या (टी.व्ही.एम्.एम्.) ट्राय व्हॅली मराठी मंडळाने धारण केले.

यंदाचे हे आमचे पाचवे वर्ष! कार्यक्रमांच्या आखणीला ह्या वर्षी सुरूवांत जरा उशीराच झाली. याहू ग्रूपचा वापर करून कार्यकारी समिति स्थापन झाली. पहिली बैठक 13 ऑगस्टला श्री नितिन गांधी यांच्या घरी झाली. श्री प्रसाद देशमुख ह्यांची एकमुखाने प्रमुख म्हणून निवड झाली. सौ. अंजली व नितीन गांधी, श्री. विलास ठुसे, सौ.नेहा कुलकर्णी, सौ वर्षा उपाध्ये, सौ. शारदा कुलकर्णी, सौ. अश्वीनी व किरण नाईक, सौ निता व शिरीष पाटील, सौ.दीपाली हर्षे, सौ. गौरी अभ्यंकर, सौ चारूता व मिलींद वैद्य, सौ वंदना व श्रीपाद चिंचणकर, श्री शार्दूल जेवळीकर, सौ योगिनी पारखी, सौ अंजली करंदीकर, सौ. निवेदिता फडणीस, सौ अंजली इनामदार, सौ शिल्पा खेर, सौ. अनुपमा भोंगळे, सौ. दीपाली देशपांडे इत्यादि उत्साही कार्यकर्त्यांच्या समुदायातून खाद्य समिति, पूजा समिति, सांस्कृतिक कार्यक्रम समिति, देणगीदार समिति, सभागृह समिति, स्मरणिका समिति, सभासद समिति, सजावट समिति, बालकार्यक्रम समिति अशी कामाची विभागणी झाली.

कार्यकारी समितिने अपार मेहेनत घेतली. प्रत्येकाने जणू काही आपले घरचे कार्य समजून कष्ट केले.

श्री नितिन गांधींनी वेबसाईटसाठी सुविधा उपलब्ध करून दिली. श्री. विलास ठुसे ह्यांनी दोन दिवसांत www.ebmm.org वेब साईट तयार केली.

सौ वर्षा उपाध्ये व सौ. अश्वीनी नाईक ह्या दोघींच्या कौशल्यामुळे देणगीदारांकडून देणग्यांचा एव्हढा वर्षाव झाला कि त्यामुळे सभासदांमध्ये एक आगळेच चैतन्य निर्माण झाले. प्लेझंटनमध्ये नव्यानेच सुरू झालेल्या

बॉम्बे आईसक्रीमच्या मालकीण श्रीमती भारती परमार ह्यांच्या औदार्याने प्रसाद भोजनाची व्यवस्था झाली. सिटी बँक एन.आर.आय. बिझिनेसने अतिशय उदार देणगी दिली.

श्री सुनिल व सौ. प्रीती चितगोपेकर ह्यांच्या सहकार्याने व अविश्रांत कष्टांमुळे आमची स्मरणिका वेळेत छापून तयार झाली.

कार्यक्रमाची सुरूवात सकाळी दहा वाजता सौ. दीपाली हर्षेंची विलोभनीय सजावट व श्री. विलास ठुसे ह्यांच्या कुशल पौरोहित्याखालील श्री गणेशाच्या प्रतिष्ठापनेने झाली. श्री. राहूल व सौ. शारदा कुलकर्णी ह्यांच्या हस्ते पूजा झाल्यावर अथर्वशीर्षाची अकरा आवर्तने आटोपून उपस्थितांनी लज्जतदार प्रसाद भोजनाचा मोदकांसह आस्वाद घेतला.
त्यानंतर कॅलिफोर्नियातील नावाजलेले गायक श्री. अजित कुळकर्णी व त्यांच्या सुकन्या सौ. अनुजा सुर्लकर ह्यांनी सादर केलेला मराठी सुगम संगीताचा “भाव सरगम” हा बहारदार कार्यक्रम प्रेक्षकांची मने जिंकून गेला. श्री. सतिश तारेंची तबल्याची साथ व सौ. सुरश्री रास्तेंची कीबोर्ड ची जोड सर्वांची वाहवा मिळवून गेली.

सौ. वंदना चिंचणकर ह्यांचे पिता श्री वसंतराव सरदेशपांडे ह्यांच्या हस्ते भावसरगमच्या कलाकारांचा उचित सत्कार करण्यांत आला.

श्री. राहूल कुलकर्णी ह्यांचे पिता श्री विश्वनाथराव ह्यांच्या हस्ते लकी ड्रॉ च्या विजेत्यांना पारितोषिके देण्यांत आली.

सौ. नेहा कुलकर्णी ह्यांच्या समयोचित खुमासदार निवेदनाने पूर्ण समारंभाला एक वेगळीच रंगत आणली.

नेहेमी प्रमाणे सौ. योगिनी व रोहन पारखींनी सर्व उपस्थितांसाठी बाटलीबंद शुद्ध पाण्याची चोख व्यवस्था केली.

मुलांचे विविध कार्यक्रम सौ. गौरी अभ्यंकर, सौ. शिल्पा खेर, व सौ. अंजली इनामदार ह्यांनी इतक्या कौशल्याने हाताळले कि तब्बल दोन तास चाललेल्या गाण्यांच्या कार्यक्रमांत सुमारे 30 मुले शेजारच्याच हॉलमध्ये आहेत ह्याचा त्यांच्या पालकांनासुद्धा विसर पडला.

दुपारी चार वाजता उत्तर पूजा, आरती, वाटल्या डाळीचा प्रसाद आणि "**गणपति बाप्पा मोरया पुढच्या वर्षी लवकर या**" च्या गजरात ह्या अत्यंत सुसुत्रब्द्ध आयोजित केलेल्या उत्कृष्ट गणेशोत्सवाची सांगता झाली.

ह्या वर्षी आम्हांला काही अनपेक्षीत अडचणी आल्या उदा. दोन दिवस आधी आम्हाला सूचना मिळाली कि ठरलेली ध्वनी योजना, ध्वनी तंत्रज्ञ व कथाकथनाचे कलाकार उपलब्ध होणार नाहीत. परंतू श्री नितीन गांधींचे कुशल मार्गदर्शन, श्री विलास ठुसे ह्यांची कार्यतत्परता, कार्यकारीणीच्या सर्व सभासदांचे प्रोत्साहन, "भाव सरगम" च्या कलाकारांचे बहुमोल सहकार्य आणि अर्थातच विघ्नहर्त्याचे आशिर्वाद अशा सुरेख संगमामुळे आम्ही सर्व संकटांतून सहीसलामत बाहेर पडलो. श्री विलास पाटील ह्यांनी श्री गांधींना ध्वनी संयोजनात मोलाची मदत केली.

अश्या ह्या संस्मरणीय प्रसंगाची क्षणचित्रे टिपण्याचे व चित्रिकरणाचे बहुमोल काम अंकुर ठुसे याने केले.

संघभावनेचा व सहकार्याचा एक सुंदर आविष्कार श्री गणेशाच्या साक्षीने उपस्थित सुमारे अडीचशे सभासदांना अनुभवायला मिळाला.

समारंभाची क्षणचित्रे पाहण्यासाठी आमच्या वेबसाइटला www.ebmm.org एकदा आवश्य भेट द्या आणि आपला अभिप्राय जरूर कळवा.

मंगलमूर्ति मोरया.

ई.बी.एम्.एम्. कार्यकारीणी मंडळ